**मे. अल्ट्राटेक सिमेंट लि. (आवारपूर सिमेंट वर्क्स) ते अल्ट्राटेक सिमेंट लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) यांना जोडणारी २२० के.व्ही. पारेषण वाहिनी उभारणीसाठी विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम ६८ अन्वये शासन मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- पावामा-२०२३/प्र.क्र. २३९/ऊर्जा-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०५ जुन, २०२४

**संदर्भ:-** १) संचालक (प्रकल्प), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई यांचे दि. २१.०६.२०२३ , दि. ५.१२.२०२३ व दि. २५.०१.२०२४ रोजीचे पत्र.
२) उद्योग, ऊर्जा , कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय क्र. पावामा २०२१/प्र.क्र.१७० ऊर्जा-४ दि. ०२.११.२०२२ नुसार निर्गमित धोरण.

**प्रस्तावना:-**

विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम १६४ व महाराष्ट्र शासनाच्या आदेश क्र.०६/प्र.क्र. ३१२/ऊर्जा-४, दिनांक २४/०८/२००६ अन्वये महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीला महापारेषण वाहीन्या व मनोऱ्यांची उभारणी संबंधात अधिकार प्राप्त आहेत. त्यानुसार महापारेषण कंपनीव्दारा मंजूर केलेल्या योजनांतर्गत पारेषण वाहीन्या उभारण्यासाठी विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम ६८ नुसार शासनाची पूर्वमान्यता मिळण्यासाठी प्रस्ताव तपासणी करुन शासनास शिफारशीत करण्यात येतो.

महापारेषणव्दारा संदर्भाधीन क्र. (१) मधील पत्र दिनांक २१/०६/२०२३ अन्वये २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. (आवारपूर सिमेंट वर्क्स) व २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) या वाहीनीची आंतरजोडणी करीता विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम ६८ अन्वये पूर्व मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव काही अटी व शर्तीवर शिफारशित केला आहे. सदर योजनेचे आरेखन प्रस्तावासोबत **(परिशिष्ट 'क')** नुसार सादर केले असून त्यातील दोन लोकेशन क्र. २ व ३ हे दर्शविलेले अंतर जोडण्यासाठी व त्यानंतर २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिंमेट कंपनी लि.(आवारपूर सिंमेट वर्क्स) ते अल्ट्राटेक सिंमेट कंपनी लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) या पारेषण वाहिनीला विद्युत अधिनियम, २००३ मधील कलम ६८ अन्वये शासनाची मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे.

मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. (यु.टी.सी. एल.) यांच्या माणिकगड (६० मे.वॅ) व आवारपुर (८४.२२ मे.वॅ) येथील सिमेंट कंपन्याची सी.पी.पी. व्दारे एकुण १४४.२२ मे.वॅ. वीज निर्मिती क्षमता आहे. चंद्रपूर जिल्ह्यातील महापारेषण कंपनीच्या २२० के.व्ही. गडचांदूर उपकेंद्र ते २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) या स्वतंत्र पारेषण वाहिनीस विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम ६८ अन्वये शासनाने दिनांक ०१.०१.२०१६ च्या पत्रान्वंये मंजूरी दिलेली आहे. तसेच २२० के.व्ही. गडचांदूर उपकेंद्र ते २२० के.व्ही.अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. (आवारपूर सिमेंट वर्क्स) वाहीनीस शासनाने विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम ६८ अन्वये मंजुरी दिली असल्याचे महापारेषण कंपनीने अवगत केले आहे. तथापी सदर मंजुरीची प्रत महापारेषण कंपनीकडे उपलब्ध नाही.

विद्युत अधिनियम, २००३ मधील कलम ६८ अन्वये महापारेषणने DDF अंतर्गत आंतरजोडणीची सदर योजना दिनांक ०९/०८/२०२२ नुसार मंजुर केली आहे. या योजनेतील पारेषण वाहीनींची उभारणी व आवश्यक पायाभूत सुविधा महापारेषणच्या देखरेखीखाली मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनीव्दारा व त्यांच्या खर्चाने होणार आहे. वाहीनीच्या उभारणीचा अंदाजित खर्च रु. ४८.७६ लक्ष इतका असून महापारेषणव्दारा रु. ३.०४ लक्ष इतके पर्यवेक्षण शुल्क आकारले जाणार आहे.

महापारेषणव्दारा वर्तमानपत्रात जाहीरात देऊन सदर योजनेबाबत हितसंबंधित व्यक्तीकडून प्रतिवेदने मागविण्यात आली आहेत. नियोजीत तारखेपर्यंत प्रतिवेदने प्राप्त झालेली नाही या वाहीनीमुळे दोन व्यक्ती बाधीत होत असून त्यांच्या पिक नुकसानीच्या मोबदल्यापोटी रुपये ५.०४ लक्ष इतक्या रकमेची अदायकी करण्यात आली असून जमीनीच्या मोबदल्याची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर महसूल विभागाकडून सुरु आहे.

विद्युत अधिनियम, २००३ मधील कलम ६८ अन्वये वाहीनी उभारणीची मान्यता आवश्यकतेनुसार शासनाव्दारे योग्य अटी व शर्ती अंतर्भूत करुन देऊ शकते. त्यानुसार महापारेषणव्दारा शिफारशीत वाहीनी उभारणीच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

१. विद्युत अधिनियम २००३ मधील कलम ६८ अन्वये, मे. अल्ट्राटेक सिमेंट लि. या कंपनीच्या महापारेषणव्दारा या शासन निर्णयासोबतच्या <u>परिशिष्ट-अ</u> नुसार मंजूर योजनेस, <u>परिशिष्ट ब</u> मध्ये महापारेषणव्दारा नमूद अटी व शर्तीसह खालील अटी तथा शर्तींच्या अधीन राहुन, परिशिष्ट-क मधील आरेखनातील वाहिनी लोकेशन नंबर २ ते ३ मध्ये पारेषण आंतरवाहीनी उभारण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - अ मध्ये नमुद केल्यानुसार पारेषण वाहिनीची उभारणी मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. ही स्वखर्चाने महापारेषण कंपनीव्दारा विहित केलेल्या प्रमाणित पध्दतीने आणि महापारेषण कंपनीच्या पर्यवेक्षनाखाली करेल.

२. २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिंमेट लि.(आवारपूर सिंमेट वर्क्स) ते अल्ट्राटेक सिंमेट लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स)या वाहिनीचे संचलन व सुव्यवस्था मे. अल्ट्राटेक सिमेंट लि. ही कंपनी स्वत: करेल.

३. विद्युत अधिनियम २००३, व त्याखालील नियम विनियम इत्यादी आणि कलम ६८ मधील अटी व शर्ती, त्यात वेळोवेळी होणारे बदल तसेच संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयानुसार वाहीनी उभारताना व उभारल्यानंतर जमिनीच्या नुकसान भरपाई पोटी संबंधित बाधीत जागा मालकास मोबदला देण्याची जबाबदारी मे. अल्ट्राटेक सिंमेट लि कंपनीची असेल.

४. वीज वाहिनी उभारताना वा उभारल्यानंतर बाधित होणाऱ्या संबंधित जागा मालकांच्या / शेतकऱ्यांच्या जर काही तक्रारी असल्यास, सक्षम प्राधिकाऱ्यासमवेत विचार विनिमय करुन त्या तक्रारींचे यथायोग्यरित्या निराकरण करणे ही जबाबदारी मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. ची राहिल.

५. सदरहु पारेषण वाहीनीचा वापर ज्या प्रयोजनार्थ करावयाचा ठरविलेला आहे केवळ त्याच योजनांसाठी करणे मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लि. यांना बंधंनकारक असेल.

६. वीज वाहिनी कार्यान्वीत करण्यापूर्वी / प्रभारीत करण्यापूर्वी याबाबतच्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून पूर्व परवानगी घेणे हे मे. अल्ट्राटेक सिमेंट लि.यांना आवश्यक असेल.

७. सदरहू वीज वाहिनी उभारण्यापूर्वी अर्जदाराला संबंधित विभागाकडून खालील प्रमाणे ना-हरकत प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. १) वन विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र, २) पर्यावरण विभागाचे ना-हरकत प्रमापणत्र, ३) आदिवासी विकास विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र. सदर मंजुरी उपरोक्त नमूद विभागांच्या ना-हरकत प्रमाणपत्रांच्य अधीन राहून देण्यात येत आहे. याशिवाय, शासनाचे विविध प्राधिकरण/विभाग/वीज नियामक आयोग इ. चे इतर प्रचलित नियम त्याचप्रमाणे शासनाने वेळोवेळी मंजूर केलेले नियम व अटी मे. अल्ट्राटेक सिमेंट लि. यांच्यावर बंधनकारक राहतील.

८. मे. अल्ट्राटेक आवारपुर व मे. अल्ट्राटेक माणिकगड सिमेंट कंपनी लिमिटेड हे महावितरण कंपनीचे दोन वीज ग्राहक आहेत. मे. अल्ट्राटेक माणिकगड सिमेंट कंपनी लिमिटेड यांना ६६ के.व्ही. व्होल्टेज स्तरावरून २२० के.व्ही. व्होल्टेज स्तरावर वर जाण्याकरिता (upgrade होण्याकरिता), २२० के.व्ही. अल्ट्राटेक आवारपुर सीपीपी वरून अल्ट्राटेक माणिकगड सीपीपी ला २२० के.व्ही. होल्टेज स्तरावर विद्युत पुरवठा करणे, मे. अल्ट्राटेक माणिकगड सिमेंट कंपनी लिमिटेड यांचे महावितरण चे कनेक्शन कमी करणे ही सर्व बाब शासनाशी निगडित नसून मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लिमिटेड यांना भविष्यात असे काही करावयाचे असल्यास मे. अल्ट्राटेक सिमेंट कंपनी लिमिटेड यांनी तसा प्रस्ताव महावितरण कंपनीकडे सादर करावा व त्यानंतर महावितरण कंपनी त्यांच्या स्तरावर नियमानुसार योग्य ती कारवाई करेल.

९. सदरहू मान्यतेचा कालावधी मान्यता दिल्यापासून २५ वर्षाचा असेल, तद्नंतर सदरहू मान्यता अपोआप संपुष्टात येईल तद्नंतर या अटी व शर्तीमध्ये शासन बदल करु शकते.

१०. वाहीनीची उभारणी झाल्यानंतर त्याच्या प्रभाव क्षेत्रात झाडे, बांधकाम इ. उभी झाल्यास व त्यामुळे पारेषण वाहिनीस व्यत्यय अथवा हस्तक्षेप होत असल्यास, महापारेषण द्वारा या संदर्भात सक्षम प्राधिकाऱ्याकडे आवेदन केल्यास अशी झाडे, बाधंकाम इ. काढून टाकण्याचे अथवा याबाबत यथायोग्य आदेश देऊ शकते.

२. विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ मधील अटी व शर्ती व त्यात वेळोवेळी होणारे बदल, या विभागाचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय क्रं. पावामो-२०२१/प्र.क्र.१७०/ऊर्जा-४ दिनांक ०२.११.२०२२ मधील अटी व शर्ती तसेच राज्य शासन व केंद्र शासनाची अशा पारेषण वाहिनीसंबंधीची वेळोवेळी जाहीर झालेली / होणारी मार्गदर्शक तत्वे व धोरणे सदरहू पारेषण वाहिनीस लागू राहतील.

३. उक्त अटी व शर्तीचा भंग केल्याची बाब शासनाच्या निर्देशनास आल्यास सदरहू मान्यता रद्द समजण्यात येईल.

४. मे. अल्ट्राटेक सिमेंट कं.लि. यांनी सदरहू वीज वाहिनी उभारणे याकरिता सर्व आवश्यक अटी शर्तीची पूर्तता, विहित निकषांची पूर्तता तसेच आवश्यक त्या परवाने प्राप्त केले आहेत किंवा कसे याबाबतची कागदपत्रे तपासण्याची जबाबदारी महापारेषण कंपनीची राहील. केंद्रशासनाच्या विद्युत मंत्रालयाने त्यांच्या दिनांक ०९.०६.२०२३ रोजीच्या आदेशान्वये वीज कायदा २००३ मधील कलम ६८ अंतर्गत दयावयाच्या मान्यतेची कार्यपध्दती विशद केली आहे.सदर कार्यपध्दती मध्ये

देण्यात आलेल्या तपासणी सूची नुसार मे. अल्ट्राटेक सिमेंट कं.लि. यांचा प्रस्ताव तपासण्याची जबाबदारी महापारेषण कंपनीची आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०२४०६०५१३०७१९७६१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.06.05 13:20:41 +05'30'

**( ना.श्री.कराड )**
**उप सचिव, (ऊर्जा) महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई.
२. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या., मुंबई.
३. संचालक (प्रकल्प) , महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र वीज नियामक आयोग, मुंबई.
५. मुख्य विद्युत वितरण अभियंता, दुसरा मजला, विद्युत विभाग, मुख्य कार्यालय, मुंबई.
६. निवडनस्ती (ऊर्जा-४)

**परिशिष्ट – अ**

| योजनेचा तपशील | योजने अंतर्गत असलेल्या वाहिनीचा तपशील | मान्यता क्र., व दिनांक व योजनेची किंमत |
|---|---|---|
| **२२०** के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट लि. (आवारपूर सिमेंट वर्क्स) ते २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) यांना परिशिष्ट-क मध्ये दर्शवल्यानुसार लोकेशन नंबर २ व ३ (०.१४५ कि.मी) जोडणारी २२० के.व्ही. पारेषण आंतरजोडणी वाहिनी उभारणे | चंद्रपूर जिल्हयातील २२० के.व्ही. अल्ट्राटेक सिमेंट लि. (आवारपूर सिमेंट वर्क्स) ते २२० के.व्ही अल्ट्राटेक सिमेंट लि. (माणिकगड सिमेंट वर्क्स) यांना जोडणारी २२० के.व्ही. वाहिनी लोकेशन नंबर २ ते ३ उभारणे - ०.१४५ कि.मी. | महापारेषण कंपनीव्दारा ठराव क्र. CE/NGP/१३५०, दिनांक ०९.०८.२०२२ नुसार रु. ४८.७६ लक्ष प्रकल्प किंमतीची योजना. |

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE4004683E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.06.05 13:21:04 +05'30'

**( ना.श्री.कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

# परिशिष्ट – ब

## TERMS AND CONDITIONS OF MSETCL

The EHV Line arrangements to M/s Ultratech Cement Co. Ltd., (UTCL) is subject to following terms and conditions:-

1) Consumer Name: – M/s Ultratech Cement Ltd. after referred as consumer.

2) Project Name: - 220 kV SCDC line for interconnection of 220 kV Ultratech (Awarpur) to Ultratech (Manikgarh) Gadchandur – 0.145 kM.

3) **Statutory Permissions:**

All the required statutory permissions mentioned below are to be initiated & obtained by Consumer.

(a) The consumer has to initiate & obtain all statuary clearance/ approval from various authorities including route approval of line & method of construction for S/s from Electrical Inspector, GOM before taking up the erection works of transmission lines and substation switchyard at their cost.

(b) Permission from Aviation authority, Railway authority, Highway & Navigation authority, Maharashtra Maritime Board, Geological survey, Archaeological survey & Coal India Ltd. etc. if applicable.

4) (a) The other miscellaneous work if involves shifting of 11KV, 33KV line, Consumer has to approach MSEDCL for shifting of line. Necessary charges required for shifting of line are to be borne by consumer.

(b) Consumer has to construct store shed at his own cost, if necessary.

5) All the works shall be executed by consumer as per MSETCL specifications and material shall be purchased from approved vender of MSETCL.

6) (a) The line survey / Cable survey, profile, tower spotting, schedule shall be done by consumer and got approved from SE, EHV Project Circle,MSETCL Nagpur.

(b) Resolving all ROW problems will be the responsibility of Consumer. i.e. M/s UTCL

(c) Forest NoC proposal shall be processed by the consumer & necessary charges shall be borned by the consumer.

(d)The equipment drawing and test reports shall be got approved from MSETCL before procurement and the material will be inspected by MSETCL before dispatch. The consumer shall arrange at his cost the inspection of proto assembly, witnessing type tests and pre-dispatch inspection of material by MSETCL. Works under consumer switchyard shall be done by the consumer at his costs. In respect of the agency for erecting the EHV line & switchyard work (Civil as well as electrical), the details of past experience of works executed by agency during last three years in physical & financial terms are to be submitted to MSETCL so as to ascertain the capability of agency for execution of line and substation and approval thereof.

7) Consumer has to pay the consultancy charges for Civil Design & Drawings / foundation design & drawing if necessary.

8) It is responsibility of the consumer to keep ready one PS class protection core of HV CT with appropriate CT ratio for Busbar protection purposes.

9) The metering CT shall be single core, single ratio commensurate with contract demand of accuracy class 0.2S, burden 15 VA and metering PT shall be of 0.2 with burden 50 VA.

10) The protection scheme shall be finalized by S.E. PAC Circle, Nagpur. Consumer has to obtain the approval of composite layout (MSETCL & consumer portion) from MSETCL.

11) Testing of line & substation equipment will be carried out by MSETCL on demand of consumer for which consumer has to pay charges separately as per MSETCL norms

12) All payments towards way leave problems, obstruction by local persons and other stakeholder are to be sorted out by consumer for scope of work to be executed by consumer. Any compensation for injuries including death shall be borne by consumer as per relevant Act.

13) Transmission line from Awarpur Cement works to Location no. 1 (both circuits) is owned by MSETCL. MSETCL reserves the rights on this line. In future, if any Consumer/ Developer approaches for connectivity then connectivity will be issued as per Grid Connectivity procedure. In that case the interface point / point of supply will be shifted to new location on same line as per prevalent Metering Code. The transmission line from 220 kV Ultratech Cement Ltd. (Awarpur Works) to 220 kV Ultratech Cement Ltd. (Manikgarh Works) upto Location no. 1 will be Owned by MSETCL, however line will be Operated and Maintained by M/s. UTCL. In future, any technical / physical changes in this line shall not be done unilaterally by M/s. UTCL.

14) It shall be the responsibility of the consumer that there should not be any power flow mixing of MSEDCL & internal generation of UTCL CPPs.

15) M/s. UTCL will not claim for any loss of power supply if any, to MSETCL/MSEDCL in case of tripping/ Outage on this single 220 kV Ultratech-Gadchandur Ckt and allied substation equipment.

16) M/s. UTCL will not claim the spare bay at 220 kV Gadchandur S/s which will become spare due to above reconnection arrangement of circuit and MSETCL may utilize the same.

17) Other terms & conditions as per grid connectivity permissions while sanctioning the scheme vide letter dtd.22.06.2022 shall be applicable.

18) **Supervision Activity: -** Supervision of work by MSETCL will be taken up in hand, only after receipt of supervision charges towards scope of work involved. The works are to be executed by consumer under supervision of CE, Nagpur Zone OR the Engineer designated by him.

19) These Terms & Conditions will be incorporated in Connection Agreement being signed by UTCL & C.E. MSETCL, Nagpur as per STU's standard Connection Agreement.

NARAYAN
SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.06.05 13:21:28 +05'30'

( ना.श्री.कराड )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

## परिशिष्ट – क




Schematic representation of portion of works (Loc.no. 2 to Loc. No. 3) to be executed by M/s. Ultratech Cement Ltd. requiring Section 68 Approval of

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.06.05 13:21:51 +05'30'

( ना.श्री.कराड )
उप सचिव, महाराष्ट्र शासन